**राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरीता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजनेंतर्गत कोटिंग क्लस्टर, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या औद्योगिक समूह प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी प्रथम टप्प्यातील अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. क्लस्टर-२०२५/ प्र.क्र. ४३/ उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक ०३/०३/२०२५

**<u>संदर्भ</u>:-** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एसएमई-२००९/ (२२९)/ उद्योग-७, दिनांक ०९/०६/२०१०.

२) केंद्रीय सूक्ष्म, लघु व मध्यम उपक्रम मंत्रालय, भारत सरकार यांच्या MSE-CDP योजनेबाबतच्या दिनांक २४/०५/२०२२ रोजीच्या मार्गदर्शक सूचना.

३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.एसएमई-२०२२/ प्र.क्र.२०१/ उद्योग-७, दिनांक २५/०४/२०२३.

४) केंद्र शासनाचे अंतिम मंजूरी आदेश क्र. 1(1518)/CDD/CFC/Coating/Satara/2024, दिनांक ०१/०२/२०२४.

५) उद्योग संचालनालयाचे राज्य शासनाचे सहभाग अनुदान मंजुरी आदेश क्र. DI/Cluster/Sanction Order/ Coating Cluster/Satara/2024/C-735, दिनांक १५/०१/२०२५.

६) उद्योग उप संचालक (औसशा), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/ औसशा/ कोटिंग क्लस्टर/ सातारा/ २०२५/अे-४७, दिनांक १५/०१/२०२५.

**<u>प्रस्तावना</u>:-**

केंद्र शासनाच्या सूक्ष्म व लघु उपक्रम - समूह विकास योजनेतून (MSE-CDP) प्रकल्प उभारणीस हातभार लावण्याच्या दृष्टीने तसेच प्रकल्पाच्या किफायतशीरपणात वाढ होणेसाठी "राज्याची सामायिक सुविधा निर्माण करण्याकरिता उद्योग समूह प्रकल्पांना अनुदान योजना" ही योजना दिनांक ०९/०६/२०१० च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेली आहे. तसेच MSE-CDP योजनेच्या दिनांक २४/०५/२०२२ रोजीच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार, राज्य शासनाच्या आर्थिक सहभाग अनुदानाची मर्यादा दिनांक २५/०४/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत करण्यात आली आहे. त्यानुसार सर्वसाधारण प्रवर्गातील औद्योगिक समूह प्रकल्पासाठी राज्य शासनाचे सहभाग अनुदान प्रकल्प किमतीच्या २०% मर्यादेत तर विशेष प्रवर्गासाठी १५% मर्यादेत अनुज्ञेय करण्यात आले आहे.

**२.** MSE-CDP योजनेअंतर्गत कोटिंग क्लस्टर, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या औद्योगिक समूह विकास प्रकल्पाकरीता रुपये २८८५.७० लक्ष इतक्या रकमेच्या सामायिक सुविधा केंद्र उभारणीसाठी दिनांक ०१/०२/२०२४ रोजीच्या आदेशान्वये अंतिम मंजूरी दिली आहे. त्यानुसार सदर योजनेच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार, उक्त प्रकल्पाची किंमत रुपये १० कोटी ते रुपये ३० कोटी दरम्यान असल्याने तसेच सदर औद्योगिक

समूह प्रकल्पामध्ये ५०% पेक्षा जास्त सूक्ष्म घटक (Micro units) असल्याकारणाने सदर प्रकल्पाकरीता राज्य शासनाचे सहभाग अनुदान प्रकल्प किमतीच्या १५% म्हणजेच रुपये ४३२.८६ लक्ष इतके अनुज्ञेय आहे. त्याचा सविस्तर तपशिल पुढीलप्रमाणे आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | विशेष हेतू वाहन संस्था (SPV) | मे. साई महादेव कोटिंग असोसिएशन, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा |
| २. | उत्पादन | इंजिनिअरिंग |
| ३. | केंद्र शासनाचे प्रशासकीय मंजूरी आदेश | दिनांक ०१/०२/२०२४ |
| ४. | वित्तीय संसाधने:- | रक्कम रुपये लाखात |
| | i. केंद्र शासनाचे सहाय्य | २०१९.९९ (७०%) |
| | ii. राज्य शासनाचे सहाय्य | ४३२.८६ (१५%) |
| | iii. SPV चा वित्तीय सहभाग | २८८.५७ |
| | iv. बँकेचे वित्तीय सहाय्य | १४४.२८ |
| | v. एकूण मंजूर प्रकल्प किमत | २८८५.७० |

**३.** MSE-CDP योजनेच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार, सदर योजनेंतर्गत मंजूरीप्राप्त प्रकल्पांना केंद्र शासनाचे मंजूर अनुदान ५०:४०:१० या प्रमाणात वितरीत करण्यात येते. तसेच केंद्र शासनाचे मंजूर अनुदान वितरीत होण्यासाठी राज्य शासनाचे सहभाग अनुदान केंद्र शासनाच्या प्रस्तावित अनुदानाच्या प्रमाणात वितरीत होणे आवश्यक आहे. कोटिंग क्लस्टर, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या औद्योगिक समूह प्रकल्पास राज्य शासनाचे ५०% सहभाग अनुदान वितरीत केल्यास केंद्र शासनाचे एकूण मंजूर अनुदान रुपये २०१९.९९ लक्ष रकमेपैकी रुपये १००९.९९५ लक्ष इतकी रक्कम प्राप्त होईल.

**४.** उद्योग उप संचालक(औसशा), उद्योग संचालनालय यांनी दिनांक १५/०१/२०२५ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार, राज्यातील प्रकल्प जलदगतीने पूर्ण होणेसाठी कोटिंग क्लस्टर, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या औद्योगिक समूह प्रकल्पास सामायिक सुविधा केंद्र (CFC) उभारणी प्रयोजनार्थ राज्य शासनाचे प्रथम टप्प्यातील ५०% म्हणजे रुपये २,१६,४३,०००/- इतक्या अनुदानाच्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

केंद्र शासनाने सूक्ष्म व लघु उपक्रम-समूह विकास योजनेंतर्गत (MSE-CDP) कोटिंग क्लस्टर, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या औद्योगिक समूह प्रकल्पास सामायिक सुविधा केंद्र (CFC) उभारणी प्रयोजनार्थ दिनांक ०१/०२/२०२४ रोजीच्या आदेशान्वये अंतिम मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार सदर प्रकल्पाची एकूण मंजूर प्रकल्प किंमत रुपये २८८५.७० लक्ष इतकी असून त्याअंतर्गत केंद्र शासनाचे अनुदान रुपये २०१९.९९ लक्ष व राज्य शासनाचे सहभाग अनुदान रुपये ४३२.८६ लक्ष इतके आहे. त्याअनुषंगाने कोटिंग क्लस्टर, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या औद्योगिक समूह प्रकल्पास प्रकल्प मंजूरीप्रमाणे तसेच MSE-CDP योजनेच्या तरतूदीनुसार राज्य शासनाचे सहभाग अनुदान रुपये ४३२.८६ लक्ष इतक्या रकमेपैकी प्रथम टप्प्यातील ५०% म्हणजेच रुपये २,१६,४३,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी सोळा लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) इतक्या अनुदानाच्या खर्चास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**२.** विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी रुपये २,१६,४३,०००/- ही रक्कम शासकीय कोषागारातून काढून कोटिंग क्लस्टर, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या प्रकल्पाच्या मे. साई महादेव कोटिंग असोसिएशन, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या विशेष हेतू वाहन संस्थेला देण्याची व्यवस्था करावी. सदर रुपये

२,१६,४३,०००/- ही रक्कम आहरण व संवितरण करावयाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

**३.** विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सदर विशेष हेतू वाहन संस्थेच्या प्रगतीवर व दिलेल्या शासकीय भागभांडवलाच्या सुयोग्य वापरावर व विनियोगावर देखरेख ठेवण्याची आवश्यक ती कार्यवाही करावी.

**४.** वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच त्याअनुषंगाने उद्योग संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार असे प्रमाणित करण्यात येते की,

a. MSE-CDP योजनेच्या दिनांक २४/०५/२०२२ रोजीच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार, राज्य शासनाच्या आर्थिक सहभाग अनुदानाची मर्यादा दिनांक २५/०४/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत करण्यात आली आहे. त्यानुसार सर्वसाधारण प्रवर्गातील औद्योगिक समूह प्रकल्पासाठी राज्य शासनाचे सहभाग अनुदान प्रकल्प किमतीच्या २०% मर्यादेत तर विशेष प्रवर्गासाठी १५% मर्यादेत अनुज्ञेय करण्यात आले आहे. कोटिंग क्लस्टर, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा या प्रकल्पास केंद्र शासनाच्या दिनांक ०१/०२/२०२४ रोजीच्या आदेशान्वये अंतिम मंजूरी देण्यात आली आहे. सदर मर्यादेच्या अधिन राहून उद्योग संचालनालयाने दिनांक १५/०१/२०२५ रोजीच्या आदेशान्वये राज्य शासनाच्या सहभाग अनुदानास मंजूरी दिली आहे.

b. सदर औद्योगिक समूह प्रकल्पाच्या सामायिक सुविधा केंद्र (CFC) उभारणी प्रयोजनार्थ राज्य शासनाचे सहभाग अनुदान खर्चास प्रथमत: मंजूरी देण्यात येत आहे. MSE-CDP योजनेअंतर्गत यापूर्वी वितरीत केलेल्या ७५ टक्के निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र उद्योग संचालनालयाकडून सादर करण्यात आले आहे.

c. वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक यांच्याकडून कोणतेही आक्षेप उपस्थित करण्यात आलेले नाहीत.

d. सदर योजनेंर्गत कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नसून निधी स्वीय प्रपंजी लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

**५.** याकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक के-७, २८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योग, (००) १०२ लघुउद्योग-केंद्र पुरस्कृत योजना (००) (२३) मंजूर औद्योगिक समूह प्रकल्पांतर्गत सामायिक व पायाभूत सुविधा विकास योजना-केंद्र शासनाचा सूक्ष्म व लघु उपक्रम-समूह विकास कार्यक्रम व औद्योगिक पायाभूत सुविधा विकास श्रेणीवाढ (आयआययूएस) (२८५१ ५४०६) ३३-अर्थसहाय्य (योजनांतर्गत)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षामध्ये या लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

**६.** सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५/०७/२०२४ व दिनांक १२/०२/२०२५ मधील सूचनांची व त्यासोबतच्या परिशिष्टात नमूद तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत असल्याने तसेच नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.४६/का.१४६१, दिनांक

०६/०२/२०२५ आणि वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ४८/२०२५/व्यय-१६, दिनांक १३/०२/२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (उद्योग) यांना दिनांक २४/०७/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

**८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०३०३१२३८३७९५१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2025.03.03 12:40:38 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२. (पाच शाईच्या सहीच्या प्रती)
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
६) उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय, पुणे. (उद्योग संचालनालयामार्फत)
७) महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, सातारा. (उद्योग संचालनालयामार्फत)
८) मे. साई महादेव कोटिंग असोसिएशन, मु. विंग ता. खंडाळा जि. सातारा.(उद्योग संचालनालयामार्फत)
९) नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
११) कक्ष अधिकारी (कार्यासन प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवड नस्ती (कार्यासन उद्योग-७).